भायखळा जिल्हा कारागृह येथे दोन टेहळणी
मनोरे बांधण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक- बीएलडी-१३९९/१/प्र.क्र.५३/पीआरएस-२.

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- १५ जानेवारी ,२००२.

पहा:- १) गृह विभाग,शासन निर्णय क्र.बीएलडी १३९४/४(१००)/पीआरएस-२,
दिनांक २९.३.१९९५.

२) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक-
बीएलडी/१३९४/३२६६/कक्ष-३,दिनांक १९.४.९९.

३) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक-
बीएलडी/१३९४/३२६६/कक्ष-३,दिनांक १४.३.२००१.

४) वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/
विनियम, दिनांक ११.७.२००१.

<u>शासन निर्णय:-</u> भायखळा जिल्हा कारागृह येथे कारागृहाच्या सुरक्षेच्या दृष्टीकोनातून दोन टेहळणी मनोरे बांधण्याकरिता येणाऱ्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता मंजूर करावी अशी कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी शासनास विनंती केली आहे.कारागृहाच्या परिसरावर व तेथील बंद्यांच्या हालचालीवर लक्ष ठेवता यावे म्हणून भायखळा जिल्हा कारागृह येथे एकूण तीन टेहळणी मनोरे बांधावयाचे असून त्यापैकी एका मनोऱ्याचे बांधकाम पूर्ण झाले आहे. व उर्वरित दोन मनोऱ्याचे बांधकाम व्हावयाचे आहे. या दोन मनोऱ्याच्या बांधकामास प्रत्येकी रु.२,९०,५९०/- प्रमाणे एकूण रु.५,८१,१८०/- ( रुपये पाच लाख एक्याऐंशी हजार एकशे ऐंशी ) इतका खर्च अपेक्षित असून या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता द्यावी अशी शासनास विनंती केली आहे.

२. कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास केलेली विनंती विचारात घेवून भायखळा जिल्हा कारागृह येथे नवीन दोन टेहळणी मनोऱ्याच्या बांधकामास येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब काही काळ शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर शासनाने काळजीपूर्वक विचार करुन शासन या आदेशाद्वारे तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ व वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक- विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११.७.२००१ मधील भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र.४,परिच्छेद क्र.२७(२)(अ) अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन व संबंधित

विवरणपत्रातील रकाना ५ व ६ मधील अटींच्या अधिन राहून शासन या निर्णयाद्वारे [illegible] जिल्हा कारागृह येथे दोन टेहळणी मनोरे बांधण्यास येणारा खर्च रु.५,८१,१८०/- (रुपये पाच लक्ष एक्याऐंशी हजार एकशे ऐंशी फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देत आहे.

१) प्रस्तावित कामाच्या खर्चाची तरतूद अर्थसंकल्पांत झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये.

२) यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेली कामे प्रथम पूर्ण करण्यात यावीत व नंतरच या कामास सुरुवात करावी.

३) सदरचे काम मंजूर अनुदानातूनच पूर्ण करण्यात यावे. यास अतिरिक्त अनुदान मंजूर करण्यांत येणार नाही.

३. यासाठी होणारा खर्च "मुख्य लेखाशिर्ष ४०५९ सार्वजनिक बांधकामांवरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१-बांधकाम,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (तुरुंग)" मागणी क्रमांक-एच-१३ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व सन २००१-२००२ या आर्थिक वर्षात मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग व नियोजन विभाग यांच्या संमतीने तसेच वित्त विभागअनौपचारिक संदर्भ क्र.सीआर १०००/२००१/व्यय-८,दिनांक २६.११.२००१ च्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( गु. अ. कुलकर्णी )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,
कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक,दक्षिण विभाग,भायखळा,मुंबई.
अधिक्षक,मुंबई मध्यवर्ती कारागृह,मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.
महालेखापाल ,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा)मुंबई.
वित्त विभाग(व्यय-८) मंत्रालय,मुंबई.
नियोजन विभाग(कार्यासन-१४११)मंत्रालय,मुंबई
सार्वजनिक बांधकाम विभाग(इमा-२)मंत्रालय,मुंबई
अवर सचिव,गृह विभाग,बीमुंबी-१,मंत्रालय,मुंबई.